**न्यायालयातील राजशिष्टाचारविषयक काम करणाऱ्या कर्मचाऱ्यांना राजशिष्टाचार विषयक कामे करण्यासाठी होणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-संकिर्ण-२०१५/प्र.क्र.२१२/का.६**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २७ एप्रिल, २०२३

**संदर्भ** :- १) विधि व न्याय विभाग, क्र.संकिर्ण-२०२२/४२६/(७३)/का.६, दि.२९.०४.२०१० चे पत्र
२) मा.मुख्य न्यायमूर्ती व मा.मुख्य सचिव यांच्यात झालेल्या दि.३१.१२.२००९ च्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना:-**

मा.मुख्य न्यायमूर्ती व मा.मुख्य सचिव यांच्यामध्ये दि.३१.१२.२००९ रोजी झालेल्या बैठकीत घेण्यात आलेल्या निर्णयानुसार राजशिष्टाचार विषयक कामे / कर्तव्ये याच्या खर्चासाठी येणाऱ्या मासिक रु.३०००/- च्या मर्यादेतील खर्च "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टातून करण्याकरिता प्रमुख जिल्हा न्यायाधीश / प्रमुख न्यायाधीश यांना प्राधिकृत करण्यासाठी अधिसूचना / आदेश निर्गमित करण्याविषयी निर्णय झाला होता. त्यानुषंगाने संदर्भ क्र.१ येथील दि.२९.०४.२०१० च्या पत्रान्वये मंजूरी देण्यात आली आहे. तथापि, वित्त विभागाने दिलेल्या निदेशानुसार सदर पत्र अधिक्रमित करुन, याबाबत शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

न्यायालयातील राजशिष्टाचार विषयक कामे करण्यासाठी होणाऱ्या खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मासिक रु.३०००/- (रुपये तीन हजार मात्र) च्या मर्यादेतील खर्च "१३-कार्यालयीन खर्च" या उद्दिष्टातून करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. तसेच, सदर खर्चाच्या प्रतिपूर्ती मंजूरीसाठी सर्व प्रमुख जिल्हा न्यायाधीश आणि प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

२. संदर्भाधीन क्र.१ येथील दि.२९.०४.२०१० चे पत्र अधिक्रमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.अमुस (व्यय)/२८७६, दि.१८.०४.२०२३ अन्वये प्रारूप मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२३०४२७१८१५२०६३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRAVIN ARUN KUMBHOJKAR

Digitally signed by PRAVIN ARUN KUMBHOJKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT,
2.5.4.20=87a3595a52aa9c93dd11cf6d08eb9c32c251f94716de23ff63e49022fdaff41f, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=27C674EF79FE187EBCDF4FA9C80062ECA97A210FB0D7B7554B8FA6D755925AD1, cn=PRAVIN ARUN KUMBHOJKAR
Date: 2023.04.27 18:21:23 +05'30'

**( प्रविण अ. कुंभोजकर )**
**उप विधि सल्लागार-नि-उप सचिव**

**प्रति,**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२.प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई / औरंगाबाद /नागपूर,
३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा )-एक, महाराष्ट्र, मुंबई,
४.सर्व प्रमुख जिल्हा न्यायाधीश / प्रमुख न्यायाधीश, जिल्हा न्यायालय /नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
५.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
६.निवड नस्ती.